**केंद्र शासन पुरस्कृत वाल्मिकी आंबेडकर आवास योजना राज्यामध्ये राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक -एचएसजी २००२/प्र.क्र.४/गृनिधो-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक : १९ सप्टेंबर,२००२**

**प्रस्तावना :-**

शहरी/नागरी भागातील झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचाविण्याचा एक भाग म्हणून केंद्र शासनाच्या नागरी विकास आणि गरिबी उपशमन मंत्रालयाने घोषित झोपडपट्टयांमध्ये राहणा-या आणि तत्सम झोपडपट्टींच्या अधिनियमाखाली घोषित न केलेल्या झोपडपट्टयांमधील लोकांचे आरोग्यास अपायकारक अशा परिस्थितीत राहणा-या आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील तथा दारिद्रय रेषेखालील कुटुंबियांसाठी वाल्मिकी आंबेडकर आवास या नावांने योजना जाहीर केलेली आहे. या योजनेअंतर्गत १) लाभधारकामार्फत नवीन घराचे बांधकाम २) ते रहात असलेल्या/अस्तित्वात असलेल्या झोपडयांची दुरुस्ती/श्रेणीवाढ आणि निर्मल भारत अभियान इत्यादी विकास कामाचा समावेश करण्यात आलेला आहे. केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या निकषाप्रमाणे वरील तिन्हीही विकास कामासाठी एकूण नियतव्ययापैकी अ) ६० टक्के नियतव्यय नवीन घराच्या बांधकामासाठी ब) २० टक्के नियतव्यय अस्तित्वात असलेल्या झोपडयांची दुरुस्ती/श्रेणीवाढ यासाठी तर क) २० टक्के नियतव्यय अशा प्रकारे निधीचा वापर करावयाचा आहे.

आर्थिक व भौतिक निकषाविषयी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार दरवर्षी उपलब्ध होणा-या निधीतून वर नमूद केल्याप्रमाणे शहरी/नागरी भागातील झोपडपट्टयांमध्ये विकास कामे करावयाची आहेत. केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे केंद्र/राज्य शासनाने ५०:५० याप्रमाणात निधी उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. केंद्र शासनाच्या निकषासह वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेची अंमलबजावणी करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

ज्या शहराची लोकसंख्या सन १९९१ च्या जनगणनेनुसार ५०,००० वा त्यापेक्षा जास्त आहे, अशा ६२ शहरातील दारिद्रय रेषेखालील झोपडपट्टीवासियांना लाभ देण्यासाठी वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेअंतर्गत केंद्र शासनाने निश्चित करुन दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार राज्यातील शहरी/नागरी भागातील झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचाविण्याचा एक भाग म्हणून सदर योजनेची अंमलबजावणी करण्याचा या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आलेला आहे. योजनेअंतर्गत इतर निकष व मार्गदर्शक तत्वे थोडक्यात खालीलप्रमाणे आहेत :-

१) **पात्रता :-** ज्या झोपडपट्टीवासियांचे नांव दि.१.१.१९९५ च्या मतदार यादीत आहे व ते त्याच ठिकाणी वास्तव्य करीत आहेत, अशा दारिद्रय रेषेखालील व आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील झोपडपट्टीवासियांना या योजनेचा लाभ देण्यात यावा.

२) **घराचे क्षेत्र :-** घराचे क्षेत्र, जागेच्या उपलब्धतेनुसार शक्यतो २२५ चौ.फुट इतके ठेवण्यात यावे.

३) **घराचा बांधकाम खर्च :-** योजनेअंतर्गत घराच्या बांधकामाचा खर्च, मेगा सिटीसाठी रु. ६०,०००/- मेट्रो सिटी साठी रु. ५०,०००/- व उर्वरीत शहरासाठी रु. ४०,०००/- प्रत्येकी असणे अपेक्षित आहे. डोंगराळ व अडचणीच्या भागाकरीता १२.५ टक्के वाढ यामध्ये लागू आहे. या निकषास अनुसरुन वाम्बी योजनेचे अनुज्ञेय अनुदान देण्यात येईल.

४) **योजनेचे अंमलबजावणी क्षेत्र :-** या योजनेमध्ये भूसंपादनासाठी निधी/सबसिडी देय राहणार नाही. झोपडपट्टयांनी व्याप्त जमिनीचा पट्टा लाभधारकांच्या नांवे नसेल तर राज्य शासन/स्थानिक स्वराज्य संस्था, अशा लोकांना त्या ठिकाणी नियमित करण्यासाठी निर्णय घेतील अथवा त्या ठिकाणी त्यांना नियमित करणे योग्य होत नसेल तर आशा लाभार्थींना त्यांच्या कार्यक्षेत्राच्या जवळपास स्थलांतरीत करतील. राज्य शासनास आवश्यक वाटल्यास आपल्या नियोजनामध्ये बदल करु शकतील.

घोषित/अघोषित झोपडपट्टी वा रहिवास करण्यासाठी असलेल्या अयोग्य असलेल्या व दाटीवाटीने राहणाऱ्या सुमारे ३०० लोकसंख्या (६० ते ७० घरांच्या कच्च्या बांधकामाची वसाहत) असलेल्या वसाहतींसाठी ही योजना घेता येईल.

५) **जमिनीचा पट्टा :-** जमिनीचा/भूखंडाचा पट्टा निवड केलेल्या लाभार्थींना देण्यात यावा. प्रामुख्याने कुटुंबातील स्त्रि व्यक्तीच्या नांवे पट्टा देण्यात येईल. जमिनीचा पट्टा

देतांना लाभधारकाला दिलेल्या कर्जाची वसुली करण्याच्या आणि आवश्यक असल्यास कर्ज प्राप्त करण्यासाठी घर आणि जमिन लाभार्थ्यांला गहाण ठेवावी लागेल या अटीस अधीन राहून सदर भाडेपट्टा देण्यात यावा.

६) **घराचे बांधकाम :-** लाभार्थ्याने सेवाभावी संस्थेच्या मार्गदर्शनाखाली किंवा शासनाने नियुक्त केलेल्या एजन्सीच्या मार्गदर्शनाखाली स्वतःचे घर स्वतःच बांधावयाचे आहे. घर कसे असावे,याची निवड करण्यास लाभार्थ्यास मुभा राहील.

७) **श्रेणीवाढ योजना :-** अस्थित्वात असलेल्या झोपडयांची श्रेणीवाढ करण्यासाठी लाभार्थीना अनुदान अनुज्ञेय आहे.

८) **लाभार्थीचे आरक्षण :-** योजनेअंतर्गत लाभार्थ्यांची निवड करतांना खालीलप्रमाणे आरक्षण ठेवण्यात यावे.

| | | |
|---|---|---|
| अ) अनुसूचित जाती/जमाती | : | ५० टक्केपेक्षा कमी नसावे |
| ब) मागासवर्गीय | : | ३० टक्के |
| क) इतर दुर्बल घटक (राज्य शासनाने व्याख्या केल्याप्रमाणे ओ.बी.सी., बी.सी. इ.) | : | १५ टक्के |
| ड) शारिरीक, मानसिक असहाय्य आणि अपंग व इतर व्यक्ती | : | ५ टक्के |

वर नमूद केलेल्या अ ते ड या प्रवर्गामध्ये पुरेशा संख्येंने लाभ नसतील तर इतर प्रवर्गांना योजनेचा लाभ देता येईल. मात्र सक्षम प्राधिका-याने विविक्षित प्रवर्गातील पुरेशा संख्येचे लाभधारक नसल्याबाबतचे प्रमाणपत्र देणे आवश्यक राहील.

उपनिर्दिष्ट प्रवर्गामध्ये, महिला कुटुंब प्रमुखास, नागरी भागातील स्वयंरोजगार करण्याऱ्या व्यक्ती किंवा शासनाकडून घोषित वृध्द निवृत्तधारक इत्यादिंना, प्राधान्य देण्यात यावे.

९) **निधीची उपलब्धता :-** वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेसाठी ५०:५० याप्रमाणे केंद्र/राज्य शासनाचे अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल (जेवढे अनुदान केंद्र शासनाचे असेल तेवढाच मॅचिंग फंड/अनुदान राज्य शासनाचे असेल.

केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे राज्य शासनाने राज्याचा ५० टक्के हिस्सा वाम्बी नावाच्या खात्यात जमा केल्यानंतर केंद्र शासनाद्वारे अनुदानाच्या हिस्स्याची ५० टक्के

रक्कम हुडकोमार्फत राज्य शासनास उपलब्ध होईल. राज्य शासनाच्या हिस्स्याची तरतूद पुढील नियतव्ययातून उपलब्ध होईलः-

अ) गृहनिर्माण विभागाचा जो नियतव्यय अजून अर्थसंकल्पीय झाला नाही, त्यातून तसेच विभागाच्या इतर योजनातून खर्च न होऊ शकणा-या रकमेचे पुनर्विनियोजन करुन तरतूद करण्यात यावी.

ब) शासनाच्या इतर विभागांच्या योजनांतून जसे, सामाजिक न्याय, विभागाकडून (अनुसूचित जाती व नवबौध्द) विशेष घटक योजनेंतर्गत बांधकामाच्या ३० टक्के रक्कम अनुज्ञेय आहे. तेवढी रक्कम अनुसूचित जाती व नवबौध्द घरांसाठी उपलब्ध करुन देण्यात येईल. इतर तत्सम जाती जसे अनुसूचित जमाती, विमुक्त व भटक्या जाती, इतर मागासवर्ग यांच्यासाठी उपलब्ध यांच्यासाठी उपलब्ध असणारे अनुदान योजनेसाठी उपलब्ध करुन द्यावे. आदिवासी उपयोजनेमधून त्या लाभार्थ्यांना विद्यमान धोरणाप्रमाणे अनुदान उपलब्ध करुन द्यावे. आदिवासी उपयोजनेबाहेरील आदिवासी संवर्गातील लाभार्थ्यांना सुध्दा विद्यमान धोरणाच्या अधिन राहून अनुदान उपलब्ध करुन द्यावे. इत्यादी विभागाकडून अनुज्ञेय असलेल्या अनुदानाची रक्कम या योजनेसाठी वापरावी.

क) वर नमूद केलेल्या अ ते ब प्रमाणे उपलब्ध होणाऱ्या अनुदानामध्ये काही रक्कम/अनुदान कमी पडल्यास तेवढे अनुदान राज्याच्या मंजूर नियतव्ययामधून नियोजन/वित्त विभागाने उपलब्ध करुन देण्यात यावे.

ड) वरील अ ते क मध्ये नमूद केलेल्या पध्दतीने अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल. मात्र असे अनुदान उपलब्ध होऊ शकले नाही तर शासन हमीवर म्हाडाने वित्तीय संस्थांकडून जसे हडको, नॅशनल हौसिंग बँक किंवा इतर संस्थांकडून कर्ज घेऊन अनुदानाची पुर्तता करावी. अशा कर्जाची परतफेड (व्याजासह आणि तत्सम खर्चासह) करण्यासाठी म्हाडाकडून प्रस्ताव झाल्यानंतर शासनाकडून यथावकाश त्याची प्रतिपूर्ती संबंधित संस्थेला जसे, म्हाडा/म.ना.पा./न.पा. यांना करण्यात येईल.

इ) केंद्र शासनाकडून सदर योजनेचे अनुदान त्वरीत मिळविण्याच्या दृष्टीने राज्य शासनाच्या वतीने अनुदानाची ५० टक्के हिस्स्याची रक्कम प्रथम म्हाडाने द्यावी. सदर राज्य शासनाच्या अनुदानाची रक्कम म्हाडास राज्य शासनाकडून प्रतिपूर्ती करुन देण्यात येईल.

ई) सन २००१-२००२ या आर्थिक वर्षात केंद्र (रु. ११.९८ कोटी) आणि राज्य शासनाचे (रु. १२.६३ कोटी) अनुदान, सन २००२-२००३ या आर्थिक वर्षात केंद्र (रु.४४.६१ कोटी) आणि राज्य शासनाच्या (मॅचिंग फंड रु.४४.६१ कोटी) उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून ६२ शहरांमध्ये वर नमूद केलेल्या तिनही घटकांसाठी आवास योजना, श्रेणीवाढ आणि निर्मल भारत ची अंमलबजावणीचे शहरनिहाय भौतिक व आर्थिक उद्दीष्टे परिशिष्ट-१ मध्ये जोडल्यानुसार असतील. पुढील आर्थिक वर्षात केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे भौतिक व आर्थिक उद्दीष्टे निश्चित करण्याचे अधिकार म्हाडास असतील.

शासनाच्या सहमतीने पुढील वर्षी आणि त्यानंतर मिळणारे केंद्र/राज्य शासनाच्या अनुदानातून भौतिक उद्दिष्ट ठरविण्याचे अधिकार म्हाडास राहतील.

१०) **योजनेची आर्थिक योग्य-योग्यता पध्दतीने अंमलबजावणी :-** ज्या ठिकाणी झोपडपट्टी पुनर्रबांधणीची योजना आर्थिक दृष्टीकोनातून सक्षम ठरत नसल्यास व ती राबविण्यास अडचण येत असेल, तर अशा झोपडपट्ट्यांच्या विकासासाठी २.५ एफ.एस.आय. सवलतीबरोबरच वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेचे अनुदान वापरता येईल. असे अनुदान म्हाडा/शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित/नगर पालिका/म.न.पा./तत्सम शासकीय स्थानिक संस्था/सेवाभावी संस्था/सुशिक्षित बेरोजगार अभियंता इत्यादींना उपलब्ध करुन देता येईल.

११) **निर्मल भारत अभियान :-** या घटकाच्या अंमलबजावणीसाठी पुढील निकष लागू राहतील.

१) शौचालयाच्या संकुलामध्ये कमीत कमी १० सीट आणि जास्तीत २० सीट असणे अपेक्षित आहे. मात्र भौगोलिक परिस्थितीनुसार, अडचणीच्या ठिकाणी कमीत कमी १० सीट बांधणे शक्य नसेल तर तेथील परिस्थितीनुसार आणि ठरवून दिलेल्या प्रमाणानुसार कमीतकमी सीट बांधण्याचा निर्णय समितीसमोर प्रस्ताव ठेवून घ्यावा.

२) स्त्री, पुरुष आणि लहान मुले यांना सोईचे असे स्वतंत्र शौचालय बांधण्यात यावी.

३) सार्वजनिक शौचालयांची देखरेख/देखभाल झोपडपट्टील रहिवाशांनी/लाभधारकांनी करावयाची आहे. याकरीता झोंपडपट्टीधारकांनी/लाभधारकांनी स्थापन केलेल्या

गटाकडे शौचालयाची संकुले बांधकाम झाल्याबरोबर तात्काळ हस्तांतरीत करण्यात यावीत.

४) वर नमूद केलेल्या परिच्छेद ३ ची पुर्तता करण्यासाठी प्रत्येक लाभार्थी कुटूंबास मासिक पास/फॅमिली कार्ड देण्यांत यावे. लाभार्थी कुटुंबाकडून देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यासाठी रु. २०/- प्रति कुटुंब एवढे शुल्क घेण्यात यावे. मात्र देखभालीसाठी जास्त खर्च येत असल्यास ही रक्कम रु. ५०/- पर्यंत वाढविण्याबाबत समितीस निर्णय घेण्यास मुभा राहील.

५) वाम्बी योजनेच्या निकषाप्रमाणे शौचालय बांधकामाचा खर्च प्रति सीट रुपये ४०,०००/- पर्यंत मर्यादित ठेवण्यात यावा. मात्र मुंबई शहरात रु. ४०,०००/- एवढया रकमेच्या मर्यादेत बांधणे शक्य नसेल तर केंद्र शासनाच्या परवानगीने निकषामधील सवलतीचा फायदा घेऊन राष्ट्रीय गलिच्छ वस्ती विकास कार्यक्रमामधील अनुदानाचा वापर करता येईल.

१२) **वाम्बी योजनेच्या अंमलबजावणीकरीता क्षेत्रनिहाय समित्याः-** लोकआवास योजनेच्या धर्तीवर योजनेच्या प्रस्तावांना प्रशासकीय मंजूरी देणे, लाभार्थी ठरविणे, प्रस्तावांच्या नकाशांना व आराखडयांना संमती देऊन अशा नकाशांना व आराखडयांना स्थानिक सक्षम प्राधिकरणाची मंजूरी घेण्याची कार्यवाही करणे आणि योजनेच्या कामाचा आढावा घेण्यासाठी, नगर परिषद क्षेत्राकरीता, महानगरपालिका क्षेत्राकरीता आणि मुंबई महानगरपालिका क्षेत्राकरीता पुढीलप्रमाणे समित्या नियुक्त करण्यांत आल्या आहेत. समितीची कार्यकक्षा परिशिष्ट-२ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील

**अ) नगर परिषद क्षेत्राकरीता समितीचे स्वरुप :-**

१ अध्यक्ष - जिल्हाधिकारी

२. इतर सदस्य - स्थानिक नगरपालिकेचे अध्यक्ष, खासदार, विधानसभा/विधान परिषद सदस्य (ज्याच्या मतदार संघात त्या स्थानिक स्वराज्य संस्था येतात), मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, संबंधित नगर परिषदेचे मुख्य अधिकारी, जिल्हा समाज कल्याण अधिकारी

महानगर क्षेत्रामध्ये महापौर व आयुक्त,
जिल्हापरिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
जिल्हा प्रकल्प अधिकारी (आदिवासी विकास)

३. सदस्य सचिव - न.पा./म.न.पा.
सिटी इंजिनिअर

४.	सदस्य सचिव - म्हाडाचा स्थानिक जिल्हा गृहनिर्माण अधिकारी.

**ब) (मुंबई म.न.पा. सोडून इतर) महानगरपालिका क्षेत्राकरीता समितीचे स्वरुप :-**

१. अध्यक्ष - आयुक्त, महानगरपालिका
२. इतर सदस्य - महापौर, खासदार, विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य (ज्यांच्या मतदार संघात त्या स्थानिक स्वराज्य संस्था येतात), जिल्हाधिकारी, जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा प्रकल्प अधिकारी (आदिवासी विकास), सहाय्यक संचालक, नगर रचना
३. सदस्य सचिव - म.न.पा./न.पा. चा सिटी इंजिनिअर

**क) मुंबई म.न.पा.क्षेत्राकरीता समितीचे स्वरुप :-**

१. आयुक्त, मुंबई म.न.पा. (अध्यक्ष)
२. मा. महापौर, मुंबई म.ना.प.
३. स्थानिक खासदार
४. सभापती, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ
५. स्थानिक आमदार
६. प्रधान सचिव, गृहनिर्माण
७. महानगर आयुक्त, एम.एम.आर.डी.ए.
८. उपाध्यक्ष, म्हाडा
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण
१०. जिल्हाधिकारी, मुंबई
११. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगरे
१२. मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ
१३. समाजकल्याण अधिकारी
१४. उप संचालक, नगर रचना, मुंबई.
१५. सदस्य सचिव, मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ.

वरील समित्यांमध्ये सदस्यांची संख्या कमी जास्त वा बदल करण्याचे अधिकार शासनास राहील. समित्यांची कार्यकक्षा परिशिष्ट २ प्रमाणे राहील. वरील समित्यांनी तयार केलेले प्रस्ताव डूडामार्फत सूडाकडे सादर करण्यांत यावेत. अशा प्रस्तावास शासनाची मंजूरी घेवून केंद्र शासनाचे अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी शासन/हुडकोमार्फत सादर करण्यांत यावेत.

१३) **राज्यस्तरीय समन्वय समिती ( एसएलसीसी):-** केंद्र शासनाच्या नगर विकास आणि गरिबी उपशमन मंत्रालयाने जारी केलेल्या दिनांक ३ जून, २००२ च्या आदेशानुसार राज्यस्तरीय समिती नंतर गठीत करण्यात येईल.

१४) **नोडल एजन्सी आणि नोडल एजन्सी चार्जेस :-** म्हाडा ही शासनाची घरबांधणी स्वायत्त संस्था असल्याने, म्हाडाला वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेची अंलबजावणी करण्यासाठी , तांत्रिक सल्ला देण्यासाठी, प्रस्ताव तयार करुन समितीची मान्यता घेण्यासाठी, केंद्र शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यासाठी, शासनाच्या विविध विभागांकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यासाठी आणि योजनेंतर्गत उपलब्ध होणारे अनुदानाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यास तसेच या व इतर तत्सम बाबींसाठी नोडल एजन्सी नियुक्त करण्यांत येत आहे. वरील कार्यवाही करण्यास म्हाडाला नोडल एजन्सी म्हणून नियुक्त करण्यांत आल्याबद्दल एकूण अनुदानाच्या निधीपैकी ५ टक्के निधी म्हाडाला अभिकरण शुल्क म्हणून देण्यांत येईल.

१५) **पायाभूत सुविधा :-** योजनेंतर्गत बाधल्या जाणा-या घरांना पायाभूत सुविधा जसे पाणी, वीज, मलःनिसारण आणि रस्ते इत्यादी सुविधा स्थानिक संस्थेमार्फत ( म.न.पा आणि न.प.) विविध योजनेखाली त्यांना उपलब्ध होणा-या निधीतून पुरविण्यांत यावे. तसेच योजनेच्या परिसरामध्ये वृक्षारोपण करण्यांत यावे, सामाजिक सुविधा उपलब्धा करुन द्यावेत.

१६) **फलक/बोधचिन्ह लावणे** :- योजना ज्या ठिकाणी राबविण्यात येईल, त्या ठिकाणी वाल्मिकी आंबेडकर आवास योजना या नांवाने फलक/बोधचिन्ह तसेच बांधकामाचे वर्ष असा तपशिल फलकावर दर्शविण्यात यावा. जिल्हा प्रसिध्दी अधिकारी यांच्या विभागाने याबाबतची कार्यवाही करावी व डुडा (जिल्हा विकास यंत्रणा) यांनी याबाबतची खात्री करावी.

१७) **अशासकीय/सेवाभावी संस्थेचा सहभाग आणि बांधकाम साहित्य इत्यादिचे तत्रज्ञान :-** नामांकित अशासकीय/सेवाभावी संस्थेचा सहभाग या योजनेच्या अंमलबजावणीसाठी करुन घेता येईल. नामांकित सेवाभावी अशासकीय संस्थेची निवड शासनाद्वारे करण्यात येईल. इमारत निर्मिती केंद्रामध्ये तयार करण्यात येणाऱ्या साहित्याचा वापर या योजनेसाठी शक्यतो करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी आणि आयुक्त, म.ना.पा. यांनी काळजी घ्यावी. ग्रामीण निवारा योजनेंतर्गत नव्याने सुरु करण्यात यावयाच्या इमारत निर्मिती केंद्रांतून निर्माण होणारे साहित्य शक्य तो योजनेंतर्गत वापरण्यात यावे.

१८) **मॉडेल्स स्लम** : मॉडेल्स स्लम ही संकल्पना राज्यातील एका शहरात हुडकोकडून उपलब्ध होणा-या अनुदानातुन राबविण्यात यावी. राज्यातील कोणत्या शहरात मॉडेल्स स्लम संकल्पना राबवावी याबाबत म्हाडास स्वतंत्ररित्या कळविण्यात येईल.

**१९)** सदर योजनच्या अंमलबजावणीसाठी नागरी भागातील गरीबी उपशमन कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीच्या वापराची सांगड यासह घालता येईल. जसे सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना आणि राष्ट्रीय झोपडपट्टी विकास कार्यक्रमाअंतर्गत उपलब्ध होणारा निधी, सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेचा वापर स्वयंरोजगारासाठी करता येईल व राष्ट्रीय झोपडपट्टी विकास कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीचा वापर परिसर सुधारण्यासाठी (एन्व्हार्यमेंटल इम्प्रुमेंट) करता येईल. पाणी पुरवठा, सॅनेटेशन आणि वीज हॉस्पीटल, शाळा इत्यादी सुविधा पुरविण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांना उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या नियतव्ययातून/निधीतून पुरविण्याची कार्यवाही करावी.

**२०)** **योजनेंतर्गंत होणारा खर्च** :- मागणी क्र.क्यू-३, २२१७, नगर विकास (१), १९१ स्थानिक स्वराज्य संस्था/महामंडळ इत्यादिंना अर्थसहाय्य, ०४, गलिच्छ वस्ती सुधारणा, वाल्मिकी आंबेडकर आवास योजना, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (०१) केंद्र पुरस्कृत योजना, (२२१७) (००)(०२) वाल्मिकी आंबेडकर आवास योजना, राज्याचे अर्थसहाय्य (२२१७) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

**२१)** हा शासन निर्णय शासनाच्या विहित विभागाच्या अनौपारिक संदर्भ क्रमांक जसे वित्त विभाग, क्रमांक-३६१४, दिनांक ७.८.२००२), नियोजन विभाग, (क्रमांक-१९५/निवि/१४७४, दिनांक ५.६.२००२), नगर विकास विभाग, (क्रमांक-९७/युडी-११/०२, दिनांक १५.६.२००२), महसुल व वन विभाग, (क्रमांक-३५९/ज-१, दिनांक २१.६.२००२--क्रमांक-१५९/ज-५, दिनांक २३.७.२००२--क्रमांक-२४२/न-१, दिनांक १.७.२००२), सामाजिक न्याय विभाग, क्रमांक-६१०, दिनांक २.६.२००२) आणि पाणी पुरवठा विभाग (पत्र क्रमांक-निभाअ-२०००/प्र.क्र.-१६/पापु-२१, दिनांक-१२.८.२००२ अन्वये) यांच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-
( डॉ. सूरेश जोशी.)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (गृ.नि) यांचे खाजगी सचिव.

५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६. महालगखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता) लेखा परीक्षा
८. संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. सर्व महानगरपालिका आयुक्त/प्रशासक.
११. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, नवी मुंबई.
१२. उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा कोकण विभाग, पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
१३. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी गृहनिर्माण भवन, वांद्रा (पू) मुंबई
१४. सह व्यव्यस्थापकीय संचालक, शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित, गृहनिर्माण भवन, बांद्रे(पू), मुंबई-५१.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रे(पू), मुंबई-५१.
१६. सर्व जिल्हाधिकारी.
१७. सर्व नगर परिषदा/नगर पालिका अध्यक्ष/मुख्य अधिकारी.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवासी लेखा परीक्षक अधिकारी, मुंबई
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१. वित्त नियंत्रक, म्हाडा, मुंबई
२२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२३. मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/नागपूर/औरंगाबाद/पुणे/नाशिक व अमरावती, गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ,
२४. मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई
२५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यय-३) व अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई,
२६. नियोजन विभाग (का. १४७४), मंत्रालय, मुंबई
२७. समाज कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
२८. विमुक्त जाती, भटक्या जमाती इतर मागासवर्ग विश्ोष मागास प्रवर्ग, कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२९. आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३०. महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३१. रोजगार हमी योजना व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३२. संचालक, समाज कल्याण,

३३.उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि राजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभगा (संनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (रजिस्टर पोस्टाने),

३४. सहसंचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई,

३५. सह सचिव (नवि २९) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

३६. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

३७. सहाय्यक संचालक लेखा, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

३८. अवर सचिव (अर्थसंकल्प), गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३९. निवड नस्ती (गृनिधो-१)